# आपला ठेवा आपल्या स्वाधीन

* प्रस्तुति *

मौलाना मुहम्मद कलीम सिद्दीकी

फुलत,मुजफ्फर नगर, (यु.पी.-२५१२०१)

*मराठी अनुवाद *

अ.सलाम

सोलापूर .(महाराष्ट्र)



# अभिप्राय

जर एखादी, अग्नींच्या निखाऱ्याची ठिणगी आपल्या समोर पडली असेल आणि एक गोजिरवाणा, भोळाभाबडा निष्पाप ,अजाण बाळ,अनवाणी तिकडे येत असेल त्याचा तो चिमुकला पाय त्या ठिणगीवर नकळत पडण्याच्या बेतात असेल,तर अशा वेळेस आपण काय कराल?

त्या बाळास पटकन उचलून कडेवर घ्याल व त्यास त्या आगीच्या ठिंगणीपासून लांब उभे कराल.त्यावेळी आपणांस अतिशय आनंद होईल व तुमचे मन आनंदाने पुलकित होऊन तुम्ही प्रसन्नतेचा अनुभव घ्याल.

याच प्रकारे जर एखादा मनुष्य आगीत होरपळला जात असेल,किंवा भाजून तडफडत असेल तर ते पाहून तुमचे मन दुःखाने भरून येईल त्याच्या असाह्य अनंत वेदना,तुमच्या अंतःकरणाला टोचतील व तुम्ही दुःखाने व्याकुळ व्हाल.

हे अस का होते,ह्याबद्दल आपण कधी विचार केलांत काय? हे ह्यासाठी की,आपण सर्व मानव, एकाच माता-पिताची संतती आहोत आणि प्रत्येकाच्या मनांत एक धडपडणारे हृदय आहे.त्यात प्रेम आहे,सहानुभूती आहे की ज्यामुळे तो एक दुसऱ्याच्या सुख दुखांत सहभागी होतो व एक दुसऱ्याच्या मदतीने प्रसन्न होतो.अशा प्रकारे खरा मनुष्य किंवा माणूस तोच,ज्याच्या मनांत संपूर्ण मानव जातीबद्दल प्रेम आहे,जो मानवतेच्या सेवेसाठी तत्पर असतो आणि प्रत्येकाच्या सुख दुखांत सामील होऊन त्यांच्या मदतीसाठी धावून येतो व ह्यालाच आपल्या जीवनाचे उद्दिष्ट समजून,त्यासाठी आपले संपूर्ण आयुष्य वेचतो.

ह्या जगातील माणसाचे जीवन क्षणभंगुर आहे आणि मृत्यू पश्चात त्याला जे जीवन मिळते ते कायमचे आहे.आपल्या खऱ्या पालनकर्त्याला (अल्लाह)ला ओळखून त्याची भक्ति व त्याचीच उपासना केल्याशिवाय,त्यांनी दाखविलेल्या मार्गाचा अवलंब

केल्याशिवाय,त्याला स्वर्ग प्राप्त होऊ शकणार नाही.अन्यथा त्याला कायमचेच नर्काच्या अग्नींचे ईंधन बनून त्यांतच सतत जळत रहावे लागेल.

आज ह्या जगांत लाखों नव्हें कोट्यावधी माणसे,ह्या नर्काचे इंधन बनून,त्यांत जळण्याच्या तयारीला लागले आहेत आणि अशा मार्गाचा अवलंब करीत आहे की,जो सरळ नर्काला भिडतो.अशा परिस्थितीत आम्हां सर्व जाणकार माणसाचे हे परम कर्तव्य आहे की,अशी माणसे जी माणूसकीची आशा बाळगतात,ज्यांच्या मनांत माणसांबद्दल आपुलकी आहे त्यांच्या बद्दल खरे प्रेम आहे.त्या सर्वांना सामोरे येऊन,त्या नर्काच्या खाईत पडणाऱ्या मानवाला वाचविण्यासाठी आपल्या जीवाची पराकाष्ठा करून आपले कर्तव्य पार पाडावे.अन्यथा आपण त्यांना जाणीव करून न दिल्याबद्दल आपला पालनकर्ता (अल्लाह)आम्हां सर्वास जबाबदार ठरवून त्याविषयी विचारणा करील.

मला अत्यंत आनंद होतो की,मानवजाती बद्दल खरी सहानुभूती बाळगणारे आणि त्यांना नर्काच्या खाईच्या अग्नींपासून वाचविण्याचा प्रयत्न करणारे,त्यांच्या दुखात सहभागी होणारे,मौलाना मुहम्मद कलीम सिद्दीकी,यांनी हे प्रेम व स्नेहाचे पुष्प अर्पण केले .ज्यांत मानवते बद्दल त्यांचे प्रेम झळकत आहे आणि ह्यासाठी त्यांनी आपले कर्तव्य बजावले आहे,की जे खरे मुसलमान होण्यासाठी आम्हां सर्वांना आवश्यक आहे.

अशा सुमती सुमनानी मी त्यांचे कौतुक करून माझ्या हदयाचे हे तुकडे आणि त्यांची अमुल्य देणगी (आपली ठेव आपल्या स्वाधीन)आपल्याला सहर्ष सादर करीत आहे.

**वसी सुलेमान नदवी**
**संपादक उर्दु अरमुगान**
**फुलत,मुजफ्फर नगर, (यु. पी.)**



# अल्लाहच्या नावाने,जो अत्यंत दयाळू व परम कृपाळू आहे

# मला क्षमा करावी

माझे प्रिय वाचक मित्र हो,मला क्षमा करा.मी माझ्या सर्व मुस्लिम बांधवातर्फे आपणांस क्षमेची याचना करीत आहे,की ज्यांनी माणसाचा सगळयांत मोठा शत्रू दानव (शैतान)च्या फंद्यात पडून आपली मोठी संपत्ती,आपणांकडून दडवून ठेवली.त्या शैतानाने पापाऐंवजी,पापीची घृणा मनांत निर्माण करून ह्या जगाला युद्धाचे रणांगण बनविले.त्या विचाराने झपाटलेल्या माणसाच्या चुकीचा विचार,करूनच त्यांना सत्य पटवून देण्यासाठी मी ही लेखणी हातात धरली आहे.जेणेकरून तुमचा मौल्यवान अधिकार,तुम्हांला परत करावा आणि नि:स्वार्थपणे प्रेम व मानवतेच्या गोष्टीची तुमच्याशी हितगुज करावी.

तोच खरा पालनकर्ता जो (अल्लाह)आपल्या मनांतल्या गोष्टी देखील जाणतो,साक्षी आहे की,ह्या गोष्टी आपणांस सांगण्यास मी नि:स्वार्थी आहे आणि सहानुभूतिपूर्वक निपक्षपातपणे माझे कर्तव्य बजावत आहे.ह्या गोष्टी आपणांस न सांगितल्यामुळे मी बेचैन होतो.माझी कित्येक रात्रीची झोप उडाली होती.आपण आपल्या मनाला विचारा,जो कधीच विश्वासघात करीत नाही आणि अगदी खरे तेच सांगतो.

# एक प्रेमवाणी

ह्या गोष्टी सांगण्यासारख्या नाहीत.पण माझी इच्छा आहे की,प्रेमाच्या माझ्या ज्या गोष्टी आहेत,त्या तुम्ही प्रेमाने ऐकाव्यात आणि वाचाव्यात,त्या पालनकर्त्यासाठी (अल्लाह)जो संपूर्ण विश्वाचा निर्माता व प्रबंधक आहे.माझ्या ह्या गोष्टी समजून घ्या. की जेणेकरून माझ्या आत्म्यास शांती मिळेल की,मी माझ्या बहिण भावडांना या गोष्टी समजावून सांगितल्या व मी माझे माणुसकीचे कर्तव्य पुर्ण केले.ह्या जगात आल्यानंतर ज्या गोष्टीची

सत्यता ओळखणे व ती स्विकारणे,हे प्रत्येक माणसासाठी आवश्यक आहे आणि हे त्यांचे उत्तर दायित्व आहे,ती प्रेमवाणी मी आपणांस सांगू इच्छितो.

## निसर्गाचे सगळ्यांत मोठे सत्य गुपित

ह्या विश्वाचे व निसर्गाचे मोठे सत्य आहे की,ह्या सृष्टीचा जगाचा विश्वाचा आणि ब्रम्हांडाचा निर्माता व त्यांचा प्रबंधक फक्त एकच एकटा पालनकर्ता (अल्लाह) आहे,तो आपले अस्तित्व आणि निपुण गुणांत एकटाच आहे.हे जग निर्माण करण्यासाठी त्याला कोणाचीच मदत लागली नाही. त्याचा कोणीच सहाय्यक नाही, साथीदार नाही.ती एक अशी शक्ती आहे,जी प्रत्येक ठिकाणी उपस्थित आहे.तोच प्रत्येकाची निगा राखतो.प्रत्येकाला पाहतो आणि न्याहाळतो.ह्या सृष्टीतील कोणत्याही झाडाचे एक पानदेखील त्याच्या आज्ञेशिवाय हलू शकत नाही.प्रत्येक माणसाचे अंतर्मन ह्या गोष्टीची साक्ष देतो की, मग तो कोणत्याही जाती धर्माचा असो,किंवा मुर्ती पुजा करणारा असो,या सर्वांचा खरा पालकर्ता (अल्लाह)केवळ एकच आहे.

माणसाच्या बुद्धीत देखील या अतिरिक्त,दुसरी कोणतीच गोष्ट येऊ शकत नाही की ह्या साऱ्या सृष्टीचा निर्माता एकच आहे.जर एखाद्या शाळेचे दोन हेडमास्टर असतील तर ती शाळा चालू शकत नाही.एका गावाचे दोन पाटील असतील तर,त्या गावाचे नियंत्रण नष्ट होते.कोणत्याही देशाचे दोन राजे होऊ शकत नाहीत.तर मग एवढी मोठी सृष्टी आणि जगाचा कारभार,एका पालनकर्त्या(अल्लाह)शिवाय अधिक देव देवता कसें चालवू शकतील.तसेच साऱ्या जगाचे नियंत्रण अनेकजण कसे करू शकतील.

## ह्या एक पुरावा

कुरआन जी ईश्वराची (अल्लाह)वाणी आहे,ती आपल्या खऱ्या ईश्वराची वाणी असल्याबद्दल असे आव्हान करते की,"जर तुम्हांला अशी शंका येते की,कुरआन ही त्या ईश्वराची (अल्लाह)ची खरी वाणी नाही,तर मग तुम्ही त्यासारखा एवढा लहानसा श्लोक(आयत)करून दाखवा,आणि ह्यासांठी अख्या जगाला तुमच्या मदतीसाठी बोलवा जर तुम्ही खरे असाल".



चौदाशे वर्षापासून आजपर्यंत ह्या पृथ्वीवर जन्म घेतलेल्या आणि विज्ञान व कॉम्प्युटर शोधून काढणाऱ्यांनी देखील,तसा प्रयत्न करून थकुन गेले.त्यांनी आपली मान खाली घातली.आणि त्यांना ही सांगण्याची हिंमत झाली नाही की,हा ईश्वराचा (अल्लाह)चा ग्रंथ नाही.

ह्या पवित्र कुरआन मध्ये,ईश्वराने (अल्लाहने)आमच्या बुद्धीमत्तेला पटेल व समजेल अशी अनेक उदाहरणे दिली आहेत. त्यातील एक उदाहरण असे आहे की,जर या पृथ्वीवर व आकाशात अनेक देव देवता असते तर सगळीकडे दंगल माजून हे संतुलन बिघडले असते.

ही गोष्ट खरी आहे. एकापेक्षा जास्त ईश्वर (अल्लाह) अगर देवी देवता असत्या तर त्यांच्यात भांडणे झाली असती. एक म्हणाला असता,आता रात्र होईल तर दुसरा म्हणतो दिवस.एक म्हणाला असता सहा महिन्याच्या दिवस असेल,तर दुसरा म्हणतो तीन महिन्याचा दिवस असेल.एक जण म्हणाला असता आज सुर्य पश्चिमेकडून उगवेल तर दुसरा म्हणाला असता पुर्वेकडून उगवेल. जर या देवी देवतांचा कारभार खरा असता तर ते ईश्वराच्या कार्यात सामील झाले असते.त्यावेळेस असे झाले असते की,त्यांच्या एखाद्या भक्तांने त्याची पूजा अर्चना करून त्यांना प्रसन्न करून वर्षा देवताला आपली गोष्ट करण्यास भाग पाडले तर त्याचवेळी मोठ्या देवताकडून हुकूम आला असता की आता वर्षा होणार नाही. त्यानंतर लहान देवता हळताळ करीत,त्याचा परिणाम असा होईल की,या जगातील माणूस टक लावून बघतोय की,दिवस अजून कसा उगवला नाही.तेव्हा त्याला कळते की,सुर्य देवांनी आज हळताळ केलेला आहे.

## खरी साक्ष

हे सत्य आहे जगातील प्रत्येक वस्तु ह्याची साक्ष देत आहे.ह्या विश्वातील सुनियोजित योजनाबद्ध व्यवस्था,ह्याची सत्यता पटवीत आहे की,ह्या ब्रह्मांडाचा निर्माता आणि प्रबंधक फक्त एकच एकटा ईश्वर (अल्लाह)आहे.तो जेंव्हा इच्छील जो इच्छील,तो करू शकतो.त्याची आपण कल्पना करू शकत नाही.त्याची मुर्ती बनवू शकत नाही.त्या ईश्वराने

(अल्लाहने) ह्या जगाला त्याच्या सेवेसाठी निर्माण केली गेली आहे. सूर्य माणसाचा सेवक आहे. वायु माणसाचा सेवक आहे, ही पृथ्वी देखील माणसांसाठी निर्माण केली गेली आहे आणि माणसाला फक्त ईश्वराचा (अल्लाहचा) दास बनून त्याचीच पूजा-अर्चना, आराधना उपासना करण्यासाठी व फक्त त्याच्याच आज्ञाचे पान करण्यासाठी बनविले गेले आहे.

## एक मोठे सत्य

त्या खऱ्या ईश्वराने, आपल्या ईशग्रंथ मध्ये एक खरी गोष्ट आम्हांला सांगितली आहे.

अनुवादः-प्रत्येक जिवाला मृत्यूची चव आखावीच लागणार आहे. तदनंतर तुम्हांला परत पुन्हा आमच्याकडे यावेच लागेल. (अनकबूत ५८)

या श्लोकाचे दोन भाग आहेत. पहिला असा की, प्रत्येक जीवधारीला मृत्युची चव चाखावी लागणारच. ही अशी गोष्ट आहे की, प्रत्येक धर्मांत, समाजांत आणि कोणत्याही ठिकाणाचा मनुष्याचा ह्या गोष्टीवर विश्वास आहे. इतकेच नव्हे तर जो धर्माला मान्य करीत नाही तो देखील ह्या सत्यापुढे आपले शिश नमवितो. आणि पशू देखील ह्या मृत्यूच्या सत्यतेला ओळखतात. उंदीर मांजराला भिवून पळतो. आणि कुत्रा सडकेवरून येणाऱ्या वाहनाला बघून पळून जातो. ह्याचे कारण हेच की, त्यांना मृत्यूचे भय व त्याचा अटळ विश्वास आहे.

## मृत्यूनंतर पुढे काय?

ह्या श्लोकाचे दुसऱ्या भागामध्ये पवित्र कुरआन आम्हांला एका मोठ्या सत्याकडे आकर्षित करीत आहे. जर माणसाच्या ते लक्षांत आले तर साऱ्या जगाचे वातावरण बदलून जाईल. ते सत्य आहे की, तुम्ही तुमच्या मृत्यूनंतर माझ्याकडे (ईश्वराकडे) पुन्हा परत याल आणि या भूतलावर आपल्या जीवनांत जसे कर्म केले, तसा त्याचा मोबदला तेथे तुम्हांला मिळेल. मेल्यानंतर तुम्हीं नासून, कुजून जाल. पण त्यानंतर तुम्ही पुन्हा जन्माला येणार नाही असे नाही. आणि हे ही सत्य नाही की तुमच्या मृत्यूनंतर तुमची आत्मा, एखाद्या योनीत, प्रवेश करील. हा दृष्टीकोन मानवी बुद्धीच्या कसोटीत खरा उत्तरणारा



नाही.

पहिली गोष्ट ही आहे की, पुनजर्न्माचा दृष्टीकोण वेदांत उपलब्ध नाही. तदनंतरच्या पुराणांत ह्याचा उल्लेख आहे. ह्यावरून लक्षात येते की, मानवाच्या शुक्राणुंवर लिहिलेल्या त्याच्या अपत्याचे गुण, पित्याच्या पुत्रावर व त्या पुत्राच्या पुत्रांत येतात. ह्या गोष्टींचा आरंभ अशाप्रकारे झाला की, शैतानाने धर्माच्या नावावर मानवाला उच्च व निच अशाप्रकारे विभागले. तेंव्हा धर्माच्या ठेकेदारांनी धर्माच्या नावांवर, नीच समजल्या जाणाऱ्या शुद्र लोकांकडून आपली सेवा करून घेण्यास सुरूवात केली. त्यावेळेस या शुद्र लोकांनी जेंव्हा त्यांना प्रश्न विचारला की, आपला जन्मदाता ईश्वर (अल्लाह) आहे. त्यांनी सर्वमानवाला डोळे, कान, नाक, वगैरे प्रत्येक अवयव सारखे दिले तर तुम्ही स्वतःला उच्च व आम्हांला नीच कसे समजता? ह्याच्या उत्तरा दाखल त्यांनी पुर्नजन्माच्या आश्रय घेऊन असे सांगितले की, तुमच्या पुर्व जन्माच्या कर्माने तुम्हांला निच बनविले आहे.

ह्या धारणेप्रमाणे सर्व आत्म्ये पुन्हा दुसऱ्यांदा जन्माला येतात. आणि आपल्या कर्माप्रमाणे पुन्हा योनी बदलून त्यांत प्रवेश करतात. अधिक कुकर्म करणारी माणसे पशुच्या योनीत जातात. त्यापेक्षा जास्त कुकर्म करणारे वनस्पतीच्या योनीत प्रवेश करतात आणि ज्यांचे कर्म चांगले असते, जे सतकर्मी असतात, त्यांना मोक्ष प्राप्त होते.

## पुनर्जन्माच्या विरोधातील तीन तथ्य

१) ह्या बाबतीत सर्वांत महत्वाची गोष्ट ही आहे की, सगळ्या जगातील विद्वान आणि संशोधन करणाऱ्या वैज्ञानिकांचे असे म्हणणे आहे की, ह्या पृथ्वीवर सर्वप्रथम वनस्पतींनी जन्म घेतला. त्यानंतर पशु, पक्षी, आणि प्राण्यांनी जन्म घेतला. नंतर कोट्यवधी वर्षांनी मानवाचा जन्म झाला. जेंव्हा ह्या जगात मानवानी जन्म घेतलाच नव्हता आणि आत्म्यांनी जर कुकर्म केलेच नव्हते, तर कोणाच्या आत्म्यांनी वनस्पतींनी किंवा पशुच्या योनीत प्रवेश केला?

२) दुसरी गोष्ट अशी की, ह्या धारणेवर विश्वास ठेवला तर, ह्या पृथ्वीवर त्याच्या

प्राण्यांची संख्या लागोपाठ कमी होत जावी कारण ज्या आत्म्याला मोक्ष मिळेल त्यांची संख्या कमी व्हायला हवी. पण सत्य असे आहे की, ह्या विशाल धरतीवर मानव, जीव-जंतु वनस्पती आणि प्राण्यांच्या संख्येत असंख्य वाढ होत आहे.

३) तिसरी गोष्ट अशी की, ह्या पृथ्वीवर जन्माला येणाऱ्या व मरण पावणाऱ्यांच्या संख्येत जमीन आसमानाचे अंतर आहे. मरणाऱ्याच्या तुलनेत जन्म घेणाऱ्या मुलांची संख्या, कितीतरी पटीने अधिक आहे. कधी, कधी कोट्यावधी डास जन्म घेतात पण मरणारे फारच कमी असतात.

काही वेळा असं सांगितल जात की, मूल त्या जागेला ओळखतो. जेथे तो पूर्वी राहत होता. तो आपले पूर्वीचे नाव देखील जाणतो आणि हे देखील की, त्याचा आता पुनर्जन्म झाला आहे. ह्या सर्व पिश्याचाच्या व सैतानाच्या गोष्टी आहेत. जे ते मुलाच्या भाषेत बोलतात. आणि आमच्या धर्माला व श्रद्धेला खराब करतात.

खरी गोष्ट ही आहे की, मरणानंतरच प्रत्येक मानवाला सत्य परिस्थितीची जाणीव होईल, की मरणानंतर तो ईश्वराच्या सानिध्यात जातो. आणि तदनंतर ह्या जीवनांत जसे कर्म केले होते त्याचप्रमाणे त्याला पुरस्कार (स्वर्ग) अथवा शिक्षा (नर्क) दिला जाईल.

## तुमच्या कर्माचे फळ मिळतील.

जर तुम्हीं चांगले कृत्य कराल आणि पुण्याच्या मार्गाने चालाल तर तो मार्ग तुम्हांला स्वर्गात नेईल. स्वर्ग, जिथे सर्व ऐश आरामाच्या सुविधा आहेत आणि अशा सुखदायक व आरामदायक सुविधा आहेत की, या जगांत तुम्ही कधी न ऐकल्यात न पाहिल्या, न ह्याची कल्पना केली असेल. तसेच येथील सगळ्यांत मोठा चमत्कार असा असेल की, आपल्या सर्व स्वर्गवासी बंधुंना येथे अल्लाहचे (ईश्वराचे) दर्शन घडेल. ह्या सारखी आनंदप्रत व उत्साहवर्धक गोष्ट दुसरी कोणतीच असू शकत नाही.

त्याचप्रमाणे जी माणसे कुकर्म करील, पाप करतील आणि आपल्या पालन कर्त्या अल्लाहच्या आज्ञेचे व आदेशाचे उल्लंघन करतील,



आदेशाचे पालन करणार नाही, त्या सर्वांना नर्कात टाकण्यात येईल. तेथे ते अग्नींत जळतील. तसेच येथे त्यांना त्यांच्या प्रत्येक पापाची शिक्षा व कठोर दंड मिळेल, आणि सगळ्यांत मोठी शिक्षा ही असेल की, तेथे त्यांना त्यांच्या पालन कर्त्याचे (अल्लाहचे) दर्शन होणार नाही, आणि त्यांच्यावर ईश्वराचा प्रचंड कोप राहिल.

## ईश्वराचा भागीदार बनविणे, सगळ्यात मोठे पाप आहे

त्या सत्य परमेश्वरानें (अल्लाहने) आपल्या पवित्र कुरआनमध्ये आम्हांला असे सांगितले आहे की, पुण्य, सतकर्म आमि सदाचार हे, लहान ही असू शकतात आणि मोठे देखील. त्याचप्रमाणे त्या पालनकर्त्या समोर (अल्लाहसमोर) पाप, कुकर्म हे देखील लहान मोठे असू शकतात.

पवित्र कुरआनमध्ये अल्लाहने (परमेश्वराने) आम्हांला असे बजावले आहे की, जर आपण अशा पापाचे धनी बनू, ज्याला अल्लाह (ईश्वर) कधीच क्षमा करणार नाही. आणि जो असे करील, तो कायम नर्कात जळत असेल आणि त्याला मृत्यूदेखील येणार नाही ते घोर पाप म्हणजे, आपण ईश्वराव्यतिरिक्त (अल्लाह) त्यात इतरांना त्याचे भागीदार ठरविणे, आपल्या डोक्याला आणि माथ्याला त्याच्या शिवाय इतरापुढे, झुकविणे, आपले हाथ दुसऱ्या कोणापुढें, जोडणे, ह्याशिवाय दुसऱ्याला पुज्य मानणे, आपल्याला मारणारा, तारणारा, रोजगार देणारा, आणि लाभ-हानी पोचविणारा समजणे, हे एक घोर पाप असून तो ईश्वरावर (अल्लाह) फार मोठा अत्याचार आहे. मग तो कोणी देवी देवता असोत, किंवा सुर्य चंद्र व नक्षत्र असोत किंवा कोणी पीर फकीर असोत. कोणालाही परमेश्वराशिवाय (अल्लाहशिवाय) पुजेच्या योग्य समजणे हे अयोग्य आहे, ज्याला तो ईश्वर (अल्लाह) कधीच क्षमा करणार नाही. ह्या शिवाय जर दुसरे एखादे पाप असेल तर ते ईश्वर (अल्लाह) इच्छील तर क्षमा करील. ह्या गोष्टी आपल्या स्वत:ला देखील नापसंद आहेत आणि आपल्या बुद्धीला देखील त्या पटत नाहीत.

## एक उदारण

उदारणार्थ, जर आपली बायको फार भांडखोर व लहान लहान गोष्टी वरून शिविगाळ करणारी असेल आणि तिला कांही सांगावे तर ती ऐकत नसेल. अशावेळी आपण तिला घराच्या बाहेर चालती हो, असे म्हणालात. तर ती म्हणते की, मी फक्त तुझीच आहे, तुझ्यापाशीच राहीन आणि माझे मरण तुझ्या दारांतच होईल. पण तुला सोडून मी एक क्षणही बाहेर जाणार नाही. अशा वेळी आपण कितीही क्रोधित झालांत व आपणाला तिचा खूप संताप व राग आला, तरीही आपण तिच्याशी संबंध ठेवम्यास विवश व्हाव.

या उलट जर आपली बायको ,आपली अत्यंत सेवा करणारी व आपली अज्ञाधारी असेल . ती प्रत्येक वेळी आपली काळजी घेत असेल, जर तुम्ही रात्री उशीरा घरी येता, तुमची प्रतिक्षा करीत असेल. आपणांसाठी अन्न गरम करून आपणांस वाढते. आपल्याशी प्रेमाने गोड गोड हितगोष्टी करते. पण जर ती एखादे दिवशी तुम्हांला असे म्हणेल की, आपण माझे पतीदेव आहांत, पण तुमच्या एकट्याने माझे काम भागत नाही. ह्या करिता मी आपले जे शेजारी आहेत त्यांना देखील मी आज पासून माझा पती बनवित आहे. हे ऐकून जर तुमच्यात जर कांही लज्जा व मानवता असेल तर तुम्हांला फार संताप येईल. तुमचं रक्त खवळून उठेल व ते तुम्हांला मुळीच सहन होणार नाही. अशा वेळी आपण संतापाने आपल्या पत्नीचा खुन कराल किंवा स्वत: आत्महत्या करण्यास प्रवृत्त व्हाल.

शेवटी असं का घडतं केवळ ह्यासाठी की, आपण आपल्या पत्नींचा कोणी दुसरा साथीदार पति म्हणून पाहू शकत नाही. तुम्हीं विर्याच्या एका घाणेरड्या थेंबापासून निर्माण झाला आहांत, तरी आपल्या पत्नीचा दुसरा कोणी भागीदार पती म्हणून व्हावा हे सहन करू शकत नाही , तर तो ईश्वर(अल्लाह) ज्याने मानवाला एका घाणेरड्या विर्याच्या थेंबापासून बनविले, त्याने त्याच्या व्यतिरिक्त दुसऱ्या कोणाला त्याचा भागीदार बनवून त्याची पुजा अर्चा करावी हे कसे सहन करील. आणि खंर पाहिल तर साऱ्या जगाला ज्याला जे काही मिळाले ते त्यांनीच दिले आहे.



ज्याप्रमाणे एक वेश्या आपली लाज सोडून प्रत्येक येणाऱ्या व्यक्तीला आपले शरीर स्वाधीन करते आणि त्यामुळे ती आपल्या नजरेत नीच ठरते. त्याचप्रमाणे तो मनुष्य जो ईश्वराला (अल्लाहला) सोडून दुसऱ्याची भक्ती करतो तो ईश्वराच्या नजरेंत त्यापेक्षा अधिक नीच व तुच्छ ठरतो. मग ते भागीदार त्या देवी देवता असोत किंवा मूर्ति अथवा इतर कोणी.

## पवित्र कुरआनमध्ये मूर्ति पुजेचा विरोध

मूर्ति पुजा करणाऱ्या लोकांसाठी पवित्र कुरआन मध्ये एक उदाहरण दिले गेले आहे की जे विचार करण्यां जोगे आहे.

अल्लाह (ईश्वर)ला सोडून तुम्हीं ज्या वस्तुची पुजा करीत आहांत, ते सगळे मिळून एक माशीदेखील निर्माण करू सकत नाही, आणि निर्माण करणे तर दूरच राहिले, पण त्या माशीने त्यांच्या समोरील एखादा पदार्थ(प्रसाद वगैरे) हिसकाऊन घेतला तर ते तिच्याकडून परत घेऊ शकत नाही, तर कसे लाचार आहेत ते पुज्य आणि किती दुर्बल आहेत ते पुजा करणारे खरं तर त्यांनी त्या परमेश्वराची(अल्लाह) मान मर्यादाच राखली नाही. जशी त्यांनी राखावयास हवी की जो सर्व शक्तीमान आणि उदंड आहे.

किती सुंदर उदाहरण दिले गेले आहे. निर्माता तर स्वत: ईश्वरच(अल्लाह) आहे. पण त्या मूर्त्या तर आपण स्वत:च्या हातांनी बनवितो. जर त्या मुर्त्यांनी थोडीशी अक्कल असती तर ते आमची पुजा करतील.

## एक चुकीचा समज

कांही लोकांचा असा समज आहे की, आम्हीं त्यांची पुजा ह्यासाठी करतो की त्यांनीच आम्हाला ईश्वराचा(अल्लाह)मार्ग दाखविला आणि त्यांच्याच द्वारे आम्हाला ईश्वराची(अल्लाह) दया प्राप्त झाली . ही गोष्ट अशी आहे की, कोणी कुली द्वारे रेलगाडीची माहिती करून घेतली तर त्यानें त्या कुलीवरच चढून बसावे, की यानेच आम्हांला गाडीची माहिती दिली.

अशा प्रकारे ईश्वरसंबंधी (अल्लाह संबंधी) खरी माहिती सांगणाऱ्यांची पुजा करणे म्हणजे गाडीला सोडून कुलीवरच चढून बसण्यासारखें आहे.

काही जण अस ही म्हणतात की आम्हीं फक्त एकाग्र चित जमविण्यासाठी मुर्त्यांची पुजा करतो हे ही फार आश्चर्यकारक आहे. एका कुत्र्याला टक लावून पाहतो आणि म्हणतो की, मी माझ्या पित्याचे स्मरण करण्याकरिता असे करतो. कुठे त्याचे पिता आणि कुठे हा घाणेरडा कुत्रा. कुठे ती निर्जिव दगडाची मूर्ति आणि कुठे तो सर्वशक्तीमान ,करुणामय आणि दयावान ईश्वर(अल्लाह) अशाने त्याचे ध्यान एकाग्रचित होईल की दुरावेल?

सांगण्याचे तात्पर्य हे की, कोणत्याही प्रकारे, कोणालाही ईश्वराचा (अल्लाह) भागीदार समजणें, हे सगळ्यांत मोठे पाप आहे. अशांना ईश्वर (अल्लाह) कधींच माफ अगर क्षमा करणार नाही आणि असा मनुष्य कायमचा नर्काचा इंधन बनेल.

## सर्व श्रेष्ठ पुण्य, श्रद्धा किंवा निष्ठा होय

अशा प्रकारे सगळ्यांत मोठे पुण्य, सदाचार आणि परोपकार आहेत. ज्याला ईमान किंवा निष्ठा असे ही म्हणतात. म्हणूनच जगातले सगळे धार्मिक असे म्हणतात की, सर्व काही येथेच सोडून जावयाचे आहे. मरणानंतर जर कांही त्याच्या बरोबर जात असेल तर ती म्हणजे त्याची श्रद्धा, निष्ठा किंवा ईमान होय. ईमानदारी किंवा ईमान राखणारा त्याला म्हणतात, जो ज्याचा हक्क त्याच्या स्वाधीन करतो. आणि हक्क न देणाऱ्याला हक्क मारणाऱ्याला जालीम किंवा जुलमी असे म्हणतात. ह्या मानवावर सगळ्यात मोठा अधिकार किंवा हक्क त्याच्या ईश्वर (अल्लाह) या निर्मार्त्याचा आहे हे ह्या करिता की सगळ्यांना निर्माण करणारा, तारणारा, मारणारा, तोच पालनकर्ता ईश्वर (अल्लाह) आहे. आणि म्हणून तो एकटाच फक्त भक्तीच्या आणि पुजेच्या लायक आहे. तर फक्त त्यालाच भक्ती आणि पुजेच्या योग्य समजले गेले पाहिजे. हे आपल्याला मिळालेले जीवन त्याच्या मर्जीप्रमाणेच,. त्याच्या आज्ञेचे पालन करून व्यतीत केलेले पाहिजे.



म्हणजेच त्यालाच मानावे त्याचीच आज्ञा पाळावी, ह्यालाच ईमान किंवा श्रद्धा असे म्हणतात आणि त्यानंतर निष्ठा प्राप्त होते. त्या एका पलनकर्त्याला मानल्याशिवाय आणि त्याच्या आज्ञेचे पालन केल्याशिवाय मनुष्य प्रामाणिक होऊ शकत नाही. तर तो बेईमान होईल.

ईश्वरांचा (अल्लाह) सगळ्यात मोठा अधिकार, हिसकावून घेऊन लोकांसमोर ईमानदारी दाखविणे, हे असे आहे की, एक दरोडेखोर ,दरोडा घालून फार मोठी संपत्ती हस्तगत करतो आणि मग एका दुकानातून ,माल खरेदी केल्यावर , त्या दुकानदाराला म्हणतो की, तुमचा मला एक पैसा जास्त आलेला आहे तो परत घ्या. दरोडा घालून एवढी मोठी संपत्ती हस्तगत करून नंतर एक पैसा जास्त आला म्हणून परत करणे, ही जशी ईमानदारी आहे त्याहीपेक्षा वाईट, आपल्या परमेश्वराला सोडून इतरांची भक्ती करणे ही होय.

ईमानदारी केवळ त्यालाच म्हणतात की, मानवाने आपल्या ईश्वराला (अल्लाह) एकटा जाणून त्या एकट्याचीच भक्ती करावी आणि त्याने प्रदान केलेल्या जीवनाचा प्रत्येकक्षण त्याच्या मर्जीप्रमाणे, त्याच्या आज्ञा पाळून व्यतीत करावयात. त्यांनी दिलेल्या जीवनाला त्याच्या आज्ञेनुसार व्यतीत करणे यालाच धर्म असे म्हणतात आणि त्याच्या आज्ञेचे पालन न करणे म्हणजेच अधर्म होय.

## खरा धर्म

सुरुवातीपासून खरा आणि सत्य धर्म फक्त एकच आहे. आणि त्याची शिकवणुक आहे की, त्या फक्त एकट्याच अल्लाह किंवा ईश्वराला मानावे आणि त्याच्याच आज्ञेचे पालन करावे, कुरआन मध्ये असे सांगितले आहे की, अल्लाहचा म्हणजे ईश्वराचा धर्म इस्लाम आहे.त्या व्यतिरिक्त जर दुसरा कोणताही धर्म आणला तर तो मान्य नाही (अल इमरान ८५)

मानवाची ही एक कमतरता आहे की, तो एक विशिष्ट सीमेपर्यंत पाहू शकतो. त्याचे कान एका विशिष्ट सीमेपर्यंत ऐकू शकतात. आणि स्पर्शाची शक्ती देखील सिमित आहे. ह्या पाच इंद्रीयाद्वारे त्याला ज्ञान प्राप्त

होते. त्याचप्रमाणे बुद्धीच्या कार्याची देखील एक मर्यादा आहे.

तो ईश्वर कोणत्या प्रकारचे जीवन पसंद करतो, त्याची पुजा कशाप्रकारे करावी, मृत्यू पश्चात काय होईल? स्वर्गांत किंवा नर्कांत आपल्याला आपले कोणते कर्म घेऊन जातात? ह्या साऱ्या गोष्टींची ,मनुष्य किंवा त्याची बुद्धी कल्पना करू शकत नाही.

## ईशदूत

माणसाच्या ह्या कमतरतेवर , दया करून त्याच्या अल्लाहने (ईश्वर) त्या महान पुरूषांद्वारे, त्यांनी ज्याला हया पदासाठी योग्य समजले. त्यांना आपल्या फरिश्त्यांद्वारे (दूत) आपले आदेश पाठविले. त्यांनी माणसाला जीवन कसे व्यतीत करावे आणि अल्लाहची (ईश्वराची) उपासना कशा प्रकारे करावी, त्या पद्धतीत दाखविल्या. अशा प्रकारे जीवनाच्या त्या गोष्टी सांगितल्या जे तो आपल्या बुद्धीच्या आधारावर समजू शकत नाही. अशा महान पुरूषांना ,संदेष्टा,नबी, रसूल किंवा पैगंबर असे म्हणतात. त्यांना अवतार असे ही म्हणू शकतो. जर ह्याचा अर्थ ज्याच्यावर हे कार्य सोपविले गेले असा असेल तर आज अवतार ह्याचा अर्थ असा समजला जातो की, तो ईश्वर आहे अथवा यानें स्वत: ईश्वराच्या रुपात अवतार घेतला आहे. हा एक प्रकारचा अंधविश्वास आहे. हे एक फार मोठे पाप आहे. अशा प्रकारच्या अंधविश्वासाने , माणसाला त्याच्या खऱ्या ईश्वराच्या भक्तीपासून वंचित करून त्याला मूर्तिपुजेसारख्या चिखलांत रुतून ठेवले.

ह्या महान पुरूषांना ,ज्यांना अल्लाहनें (ईश्वराने) मनुष्यास खरा मार्ग दाखविण्यासाठी निवडले आणि त्यांना प्रेषित, नबी, रसूल किंवा पैगंबर असे म्हटलें . ते प्रत्येक वस्तीत, क्षेत्रात आणि प्रत्येक युगांत येत राहिले. त्या सर्वांनी फक्त एका ईश्वराची भक्ती करण्यास, त्याला फक्त एक मानण्यास आणि ईश्वराच्या इच्छेप्रमाणे जीवन व्यतीत करण्याची जी पद्धत आहे त्या धार्मिक पद्धतीची व रिती रिवाजाची शिकवण करून दलि व तशी ती अंमलात आणण्यास सांगितले. त्यासर्वांपैकी एका संदेष्ट्याने देखील फक्त एका ईश्वराशिवाय ,दुसऱ्या कोणाचीही , भक्ती करण्यांस सांगितले नाही,



तर त्यांना तसे करण्यापासून रोखले. व तसे करणे सगळ्यांत मोठे पाप आहे असे बजावले. यामुळे लोकांनी त्यांच्यावर विश्वास ठेवून खऱ्या आणि सत्याच्या मार्गावर वाटचाल केली.

## मूर्ति पुजेचा आरंभ

असे सर्व संदेष्टा(पैंगबर) आणि त्यांचे अनुयायी ही सर्व माणसेंच होती. त्यांना मृत्यू अटळ होता अमर केवळ अल्लाह(ईश्वरच) आहे. ह्या संदेष्ट्यांच्या मृत्यू नंतर, लोकांना त्यांची आठवण येऊ लागली व त्यांच्या आठवणीमुळे ते दु:खाने सारखे रडू लागले. यामुळे शैतानांस संधी मिळाली, जो माणसाचा शत्रु होता. अल्लाहनें (ईश्वराने) त्याला माणसांच्या मनांत वाईट विचार आणण्याची व त्यांना फसविण्याची शक्ती दिली आहे, की मनुष्यांची परिक्षा घ्यावी की कोण ईश्वराचा खरा भक्त आहे व कोण शैतानाचे ऐकतो.

शैतान, मानवाचे रुप घेऊन लोकाजवळ आला आणि म्हणाला, तुमचे तुमच्या महागुरु (संदेष्टा किंवा पैगंबर) वर फार मोठे प्रेम आहे. मेल्यानंतर ते तुमच्या दृष्टीआड झालेत. तेंव्हा मी तुम्हांला त्याची एक मूर्ति बनवून देतो. त्याला पाहून तुमचे मन प्रसन्न होईल. अशा प्रकारे शैतानानें संदेष्ट्या(पैगंबराची) मूर्ति बनवून दिली. ज्या वेळेस लोकांना त्यांची आठवण येई,सर्वजण त्या मूर्तिजवळ जात व तिचे दर्शन घेत व आपले मन प्रसन्न करून जात. अशा प्रकारे हळू हळू त्यांच्या मनात त्या मूर्तिचे प्रेम निर्माण झाले. त्यावेळेस शैतानानें त्यांना असे सांगितले की तुम्ही या मूर्तिची पुजा करा आणि त्याला नतमस्तक व्हा. म्हणजे तुम्हाला त्या मूर्तित ईश्वर मिळेल. अशा प्रकारे मनुष्य ज्याच्या मनांत त्या मूर्तिबद्दल प्रेम निर्माण झाले होते तो त्याची पुजा करूं लागला व आपले शिश त्याच्यापुढे झुकवू लागला, अशा प्रकारें ज्या ईश्वराची त्याला भक्ती करावयास हवी होती, त्याला सोडून तो मूर्ति पुजेच्या मागे लागला व त्यास ईश्वराचा विसर पडला.

ह्या अख्या जागाचा, सरदार (प्रतिनिधी) म्हणून ईश्वराने माणसाची निवड केली. पण जेंव्हा तो दगड व माती समोर नतमस्तक होऊ लागला,

तेंव्हा तो अपमानित झाला आणि ईश्वराच्या नजरेंत तुच्छ ठरून ,कामयचा नर्काच्या अग्नींचा ईंधन बनला. त्या नंतर ईश्वराने पुन्हा आपले दूत,संदेष्टा किंवा पैगंबर पाठवून लोकांना मूर्तिपुजा व ईश्वराशिवाय दुसऱ्याची भक्ती करण्यांपासून त्यांना रोखले. काही लोकांनी त्यांची गोष्टी ऐकलीव काहींनी त्यांचे म्हणणे न ऐकतां त्यांचा अपमान केला. ज्या लोकांनी त्याची गोष्ट ऐकून ,मूर्तिपुजा आणि ईश्वराशिवाय इतरांची भक्ती व पुजा करण्याचे सोडून दिले त्यांच्यावर ईश्वर प्रसन्न झाला व त्यांनी ऐकले नाही. व ईश्वराच्या दुताचा अपमान केला, त्यांच्या करिता ईश्वराने आकाशातून विनाशाचा निर्णय जाहिर केला.

## संदेष्टा आणि पैगंबराची शिकवण

या पृथ्वीवर एका मागून एक, जे संदेष्टा किंवा पैगंबर येत राहिले.त्यांच्या धर्माचा आधार एकच होता. ते अशा धर्माकडे बोलवित , ज्यांत फक्त एकाच अल्लाहाची (ईश्वराची) भक्ती व पुजा करण्यांस सर्वजण बाध्य होते. त्यांचा उपदेश हाच होता की, फक्त एका अल्लाह(ईश्वर) शिवाय, दुसऱ्यास त्यांच्या गुणांत अगर व्यक्तीमत्वात सामिल करू नये. ईश्वराच्या सर्व संदेष्ट्यांवर विश्वास ठेवा, त्यांना खरे माना ईश्वराने. ईश्वराचे दूत (फरिश्ते) जे खात नाहीत, पीत नाहींत, न त्यांना झोप येते. ते ईश्वराच्या आज्ञेचे पालन करण्यासाठी नेहमी तत्पर असतात. त्या ईश्वरदूताद्वारे आपल्या संदेष्टा किंवा पैगंबराद्वारे जो उपदेश दिला आणि धर्म ग्रंथ पाठविला त्या सर्वांना तुम्ही सत्य जाणा. मृत्यूनंतर पुन्हा जीवन मिळेल, त्यांत आपल्या कर्मानुसार ,चांगला किंवावाईट (स्वर्ग अथवा नर्क) असा त्याचा मोबदला मिळेल, यावर विश्वास ठेवा आणि हे देखील लक्षांत ठेवा की, ईश्वराने आपल्या नशीबी जे चांगले किंवा वाईट भाग्य लिहिले आहे. ईश्वराला प्रसन्न करण्यासाठी त्यांत खुश रहा व त्याचे आभार माना आणि ईश्वरदूताद्वारे, प्रेषितांनी आपणांस आपले जीवन जगण्याचा जो मार्ग दाखविला, ज्या धार्मिक रिती सांगितल्या त्यांचे अनुकरण करा.

या जगांत जे संदेष्टा किंवा पैगंबर होऊन गेलेत ते सर्व खरे होते



आणि त्यांचे जे ईश्वरीय धर्मग्रंथ आहेत, ते ही सर्व सत्य आहेत. त्या सर्वांवर आमची श्रद्धा (ईमान ) आहे आणि त्यांच्यात आम्ही पक्षपात किंवा लहान थोर असा दुजाभाव करीत नाही.त्यांत खऱ्याची कसोटी फक्त हीच की, ज्यांनी आम्हांला एक ईश्वराच्या भक्तीसाठी आमंत्रित केले असेल आणि त्यांच्या शिकवणीत त्या व्यतिरिक्त ,अन्य कोणाची ही पुजा करण्यासाठी सांगितले नसेल किंवा त्यांची स्वत:ची पुजा करावी, अशी शिकवण नसेल, तेच महापूरुष खरे संदेष्टा किंवा पैगंबर होत आणि ज्यांनी मूर्तिपुजा आणि अनेकेश्वरवादाची शिक्षा दिली असे पुरुष एक तर संदेष्टा किंवा पैगंबर नाहीत किंवा त्याच्या शिक्षेत फेरबदल केलेले आहे. हजरत मुहम्मद पैगंबर यांच्या पुर्वी होऊन गेलेले सर्वसंदेष्टा किंवा पैगंबर यांच्या शिक्षेत व धर्मग्रंथात बदल केलेले आहे.

## अंतिम संदेष्टा हजरत मुहम्मद पैगंबर (स्व.)

हे एक बहुमूल्य सत्य आहे की, सर्व येऊन गेलेले संदेष्टा आणि पैगंबर यांच्याद्वारे आणि त्याच्यावर अवतारित धर्मग्रंथात ,एक अंतिम संदेष्टा किंवा पैगंबरासंबंधी भविष्यवामी आहे आणि असे सांगितले आहे की, ते आल्यानंतर व त्यांची ओळख पटल्यावर, पुर्वीचे सर्व धर्मिक प्रथा, यांचा त्याग करून, त्यांनी आणलेला धर्मग्रंथ आणि त्यांनी सांगितलेल्या धर्मावर विश्वास प्रकट करून त्यांचे अनुकरण करावे. हे ही इस्लामाच्या सत्यतेचे एक प्रमाण आहे की, प्राचीन धर्मग्रंथात अनेक फेरफार केल्यानंतरही ईश्वराने आपल्या अंतिम पैगंबराच्या येण्याच्या गोष्टीला तसेच राहू दिले, कारण कोणी नंतर असे म्हणून नये की, या गोष्टी आम्हांला माहित नव्हत्या, वेदात त्यांचे नांवे नराशंस, पुराणामध्ये कल्कि अवतार बाईबल मध्ये फारकलीट आणि अहमत तर बुद्धाच्या ग्रंतात अंतिम बुद्ध असे लिहलेले आहे.

अधिक माहितीसाठी वाचा, पंडित वेद प्रकाश उपाध्याय यांची पुस्तकें 'कल्कि अवतार आणि मुहम्मद साहब' नराशंस आणि अंतिम ऋषी.'

# हजरत मुहम्मद पैगंबर यांचा जीवन परिचय

हजरत मुहम्मद (स्व.) यांचा जन्म, सौदी अरेबिया या देशांत मक्का या शहरामध्यें सुमारे साडेचौदाशे वर्षापुर्वी झाला, जन्मांनंतर काही महिन्यांतच त्यांच्या वडिलांचा स्वर्गवास झाला. त्यांची आईपण जास्त दिवस जगू शकली नाही. त्यांच्या पश्चात,आधीत्यांच्या आजोबांनी, त्यानंतर त्यांच्या काकांनी त्यांचा सांभाळ केला. जगांत सगळ्यांत वेगळा असा हा बालक, संपूर्ण मक्का वासीयांचा आवडता आणि लाडका बनला.

जसजसे आपण मोठे होत गेलांत ,तसतसे लोकांमध्ये त्यांचे प्रेम वाढत गेले. त्यांची सत्यवान आणि ईमानदार म्हणून गणना होऊ लागली. लोक आपल्या मौल्यवान वस्तु, त्यांच्या जवळ सांभाळण्यासाठी देत. आपसातील भांडणतंटा मिटविण्यासाठी, लोक त्यांनी बोलवत व त्यांचे ऐकत .मक्का शहराच्या काबा या ठिकाणी, जे ईश्वराचे पवित्र स्थळ आहे, ते जीर्ण झाल्यानें, नव्याने बांधण्यात येत होते. त्या भिंतीत एका कोपऱ्यामध्ये एक पवित्र दगड लावायचे होते. त्याचे पावित्र्य राखण्यासाठी व याचा मान संपादन करण्यासाठी, तो मिळावा म्हणून सर्वजण तलवारी घेऊन, तो अधिकार प्राप्त करण्यासाठी ,मैदानात आले. तेव्हा एक प्रतिष्टीत आदरणीय सदाचारी माणसाने असे सांगितले की, उद्या पहाटे जो माणुस सर्वप्रथम येथे येईल, तोच याचा निर्णय देईल. याला सर्वजण राजी झाले. त्या दिवशी सर्वप्रथम पहाटे येणारे, हजरत मुहम्मद (स्व.) हे होते. त्यांना पाहून सगळ्यांना आनंद झाला. आणि सर्वांनी एका सूरांत त्यांची वाहवाह केली आणि म्हणाले हे तर खरे व ईमानदार आहेत, त्यांचा निर्णय आम्हांला मान्य आहे.

त्यांनी एक चादर जमीनीवर अंथरून, त्यांत तो पवित्र दगड ठेवला आणि लोकांना असे सांगितले की, प्रत्येक वंशाच्या एक एक सरदारांनी ,ह्या चादरीचा एक एक कोपरा पकडून, याला उचलावा. अशा प्रकारे तो पवित्र दगड जेंव्हा ते त्या ठिकाणी भिंतीजवळ घेऊन गेले , तेंव्हा आपल्या स्वत:च्या हातानी तो पवित्र उचलून त्यांनी त्या भिंतीत बसविले. अशाप्रकारे



ही जीवघेणी लढाई समाप्त झाली.

अशा प्रकारे सर्वजण, प्रत्येक कार्यात, त्यांना पुढे करीत. एखाद्या वेळी जर ते यात्रेस जाण्यासाठी निघत, तर लोकांना फार दु:ख होई व ते परतल्यावर त्यांना मिठी मारून जोर जोराने ते रडत असत.

त्या काळात ईश्वराचे प्रतिक असलेल्या काबा गृहात तीनशेसाठ देंवी-देवतांच्या मूर्ति ठेवलेल्या होत्या. आणि संपूर्ण अरब देश उंच-नीच,स्पृश्य-अस्पृश्य ,दारु पिणे, जुगार खेळणे, व्याज घेणे, स्त्रीयांवर अत्याचार करणे, बलात्कार आणि खून, मारामाऱ्या अशा नानाप्रकारच्या कुप्रथांनी ग्रासलेला होता.

वयाच्या ४० व्या वर्षी,ईश्वराने आपल्या ईशदूतांद्वारे (फरिश्ते) आपणांवर कुरआन अवतरण्यास सुरुवात केली आणि आपणांस पैगंबर (संदेष्टा) या पदावर नियुक्ती केल्याचा शुभ संदेश पाठविला. आणि लोकांनी एकेश्वरवादाची दिक्षा देण्याचे जटील कार्य त्यांना सोपविण्यात आले.

## सत्याची हाक

हजरत मुहम्मद (स्व.) नी एक पर्वताच्या शिखरावर चढून हाक मारली. लोक ती हाक ऐकून धावून आले.कारण ती एका सत्यवान व ईमानदार माणसाने दिली होती. त्यावेळेस त्यांनी लोकांना प्रश्न केला आणि म्हणाले '' जर मी तुम्हांस असे सांगितले की, या पर्वताच्या मागे एक विशाल सेना तुमच्यावर हल्ला करण्यास येत आहे तर काय तुम्हीं माझ्यावर विश्वास ठेवाल?

सगळ्यांनी एका सुरत म्हटले की, असा कोण आहे जो आपल्यावर विश्वास ठेवणार नाही तुम्ही तर कधींच खोटे बोलत नाही आणि पर्वताच्या शिखरावरून आपण पलीकडे देखील चांगले पाहू शकता''

त्यानंतर त्यांनी लोकांना इस्लाम धर्म स्विकारण्यास सांगितले, मूर्ति पुजा करण्यास मनाई केली, आणि मृत्यू पश्चात नर्काच्या अग्नींची भीती दाखविली.

## मानवाची एक कमतरता

माणसाची ही एक कमतरता आहे की तो आपल्या पुर्वजांच्या चुकीच्या समजुतीकडे ,अंधविश्वासाने प्रेरित होऊन, त्या खऱ्या मानतो. माणसाची बुद्धी व त्यांच्या अनुभवानें, ज्या गोष्टी नाकारल्या ,त्या केवळ आपल्या पुर्वजांच्या म्हणण्यावर विश्वास ठेवून त्यावर कायम राहतो व त्याच्या विरुद्ध तो कांही ही ऐकण्यास तयार नसतो.

## अडथळे आणि परिक्षा

म्हणूनच की काय, वयाच्या चाळीस वर्षापर्यत पैगंबरावर विश्वास ठेवणारे त्यांना खरा व ईमानदार मानणारे, मक्कावासी लोक, त्यांच्या या उपदेशाने व त्यांनी केलेल्या मूर्तिपुजेच्या विरुद्ध प्रवचनावरून त्यांचे कट्टर शत्रु बनले. ते ह्या खऱ्या धर्माबद्दल लोकांना जितके समजावून सांगत, तेवढे ते त्यांच्याशी जास्त शत्रुता बाळगत. ज्या थोड्या फार गोर गरिब व गुलाम वंशाच्या लोकांनी इस्लाम धर्म स्विकारला. त्यांना ही ते त्रास देत , मारपीट करीत, अग्नींवर झोपवत, गळ्यांत दोर अडकावून रस्त्यावरून फर फडत ओढून नेत तर कधीं त्यांच्यावर दगडांचा वर्षाव करीत. तरी पण पैगंबर त्या सर्वांसाठी ईश्वराजवळ प्रार्थना करीत, त्याचा बदला घेत नसत. संपूर्ण रात्र जागरण करून, त्यांना सुबुद्धी देण्यासाठी ईश्वराला विनवाणी करीत. अशाप्रकारे जेव्हा मक्कावासियांनी त्यांचा अतिशय छळ केला, तेंव्हा त्यांनी ताईफ या गावाकडे प्रयाण केले. तेथील लोकांनी देखील या महापुरूषाचा अपमान केला. त्यांच्या मागे खोडकर मुलें पाठविले, जे त्यांना शिविगाळ करीत .त्यांना दगडाने मारत, ज्यामुळे त्यांचा पायातून रक्त वाहू लागे. त्या असह्य वेदनांमुळे त्यांना चालणे अशक्य होई, तेंव्हा ते खाली बसत. तेंव्हा ती मुलें त्यांना पुन्हा उभे करीत व दगडानें मारीत. शेवटी ते त्या गावातून निधून बाहेर आले आणि एका ठिकाणी विसावा घेतला.अशा प्रसंगी त्यांनी त्या लोकांना व मुलांना शाप दिला नाही.तर ईश्वराशी अशी प्रार्थना केली की,''हे परमेश्वरा यांनी सुबुद्धी दे.हे काय करीत आहेत ते त्यांनाच माहित नाही''.त्यांना पैगंबर यापदावर केलेल्या नियुक्तीमुळे आणि एकेश्वरावादाची



दिक्षा देण्याचे कार्य,ईश्वराने सोपविल्यामुळे त्यांना त्यांच प्रिय मक्का शहर सोडावे लागले.एका पर्वताच्या गुहेत साडेतीन वर्षे कैदेत काढावी लागली.यावेळी ते झाडांची सुकलेली पाने खाऊन दिवस घालवित.त्यानंतर त्यांनी मदिना शहराला प्रयाण केले.तेथे देखील मक्कावासी आपले सैन्य बनवून त्यांच्याशी लढायला वारंवार जात.

## सत्यमेव जयते

सत्य नेहमीच जिंकते.त्याचप्रमाणे येथे ही सत्य यशस्वी झाले तेवीस वर्षाच्या कठिण परिश्रमानंतर त्यांना विजय प्राप्त झाला.आणि सत्याच्या मार्गाने आपल्या नि:स्वार्थ परिश्रमाने,त्यांनी साऱ्या अरब देशाला इस्लामच्या शितल छत्र छायेत आणून सोडले आणि सगळ्या जगात एक क्रांती आली, ज्यामुळे मुर्ती पूजा बंद झाली, ऊच-नीच भेदभाव समाप्त झाला आणि सर्वजण फक्त एकाच ईश्वराचे भक्त बनुन त्याचीच भक्ती करू लागले.

## अंतिम संदेश

आपल्या मृत्यूच्या काही वर्षापूर्वी त्यांनी जवळ,जवळ सव्वा लाख लोकांना उद्देशून प्रश्न केला की,''लोक हो मृत्यूनंतर जेंव्हा तुमच्या कर्माबद्दल विचारणा होईल,त्यावेळी माझ्याविषयी देखील विचारले जाईल की,मी तुम्हांस ईश्वराच्या धर्माची व सत्यतेची संपूर्ण माहिती दिली किंवा नाही?''सर्वांना एक स्वरात उत्तर दिले''होय आपण ती दिलेली आहे''.त्यानंतर आपले बोट, आकाशाकडे केले व तीन वेळा म्हणाले ''हे परमेश्वरा,तू यांचा साक्षी रहा,यांचा साक्षी रहा,यांचा साक्षी रहा,''त्यानंतर त्यांनी लोकांना उद्देशून पुढे असे म्हणाले की,लोक हो,या सत्य धर्माची गोष्ट ज्यांनी ऐकली व ती समजवून घेतली,त्यांचे हे कर्तव्य आहे की,ज्यांना ही गोष्ट माहित नाही,व ज्यांनी ती ऐकली नाही,त्यांना ही तुम्हीं ती समजावून सांगावी''.

त्यांनी ही शुभवार्ता आम्हांला ऐकविली की,मीच तो अंतिम संदेष्टा आहे.आता माझ्या नंतर पुन्हा दुसरा कोणताच संदेष्टा येणार नाही.मीच तो अंतिम संदेष्टा ,रसूल,पैगंबर,अंतिम ऋषी, नराशंस किंवा कल्कि अवतार

आहे,ज्याची तुम्ही प्रतिक्षा करीत आहांत आणि ज्याच्या बद्दल तुम्हाला सर्वकाही माहीत आहे.कुरआनांत असे म्हटले आहे की,''ज्या लोकांनी आम्हांला हा ग्रंथ दिला आहे.ते मुहम्मद पैगंबर (स्व.) यांना ओळखतात,जसे ते आपल्या मुलांना ओळखतात.पण होय यांत एक समूह असा आहे की,जो सत्याला लपवित आहे''(अल्‌बकरा:१४७)

## प्रत्येक माणसाचे कर्तव्य

आता प्रलय काळापर्यंत (कियामत) या जगांत येणाऱ्या प्रत्येक माणसाचे हे कर्तव्य आहे की,त्याच्या धार्मिक व मानवतेचे हे दायित्व आहे की,त्याने फक्त एकाच ईश्वराची (अल्लाहची) भक्ति करावी.त्यांत त्याचा इतर कोणी भागीदार अथवा साथीदार बनवू नये किंवा त्यांना त्याच्या श्रेणीत आणू नये आणि तसे समजू देखील नये.तसेच त्यांचे अंतिम प्रेषित,हजरत मुहम्मद पैगंबरांना सत्य जाणून त्यांनी सांगितलेल्या इस्लाम धर्माचा स्विकार करावा.ह्यालाच इस्लाम धर्मात ईमान असे म्हटले आहे.जर असे करणार नसाल तर तुम्हांला मृत्यूनंतर कायमचेच नर्कात जळत रहावे लागेल.

## दोन प्रश्न

आता आपल्या मनांत दोन प्रश्न उद्‌भवतील.पहिला असा की,ते असं का?मृत्यूनंतर स्वर्ग आणि नर्क मध्ये जाऊ असे काही दिसत नाही;तर मग आपण त्याला का मान्य करावे?

याबाबतीत आपण जर थोडा विचार कराल तर आपणांस असे आढळून येईल की,सर्व धर्मग्रंथात स्वर्ग आणि नर्क याचा उल्लेख केलेला आहे.तसेच त्याचे सविस्तर वर्णन देखील दिलेले आहे.यावरून हे सिद्ध होते की,सर्व धर्मांनी स्वर्ग आणि नर्क याचे अस्तित्व आणि उद्दिष्ट मान्य केलेले आहे.

यालाच आपण दुसऱ्या एका उदाहरणाने देखील समजू शकतो.ज्यावेळेला मूल गर्भावस्थेत,आईच्या पोटात असते तेंव्हा जर आपण त्याला असे म्हणालो की,ज्यावेळेस तू गर्भाच्या बाहेर येशील तर,आईचे दूध पिशील,रडशील आणि या जगातील साऱ्या वस्तु तुला दिसतील.तेंव्हा तो



गर्भावस्थेत असतांना,या गोष्टीवर विश्वास ठेवणार नाही.परंतु जेंव्हा तो,गर्भाच्या बाहेर येईल,त्यावेळेस त्याला ह्या साऱ्या गोष्टी आढळतील.अशाप्रकारे हा समस्त जगाचा संसार म्हणजे एक गर्भअवस्था आहे आणि त्याच्या मृत्यूनंतर जेंव्हा तो परलोकांत जाईल,त्या वेळेस हे सर्व सत्य त्याच्या दृष्टीस पडेल.

आम्हांला या स्वर्ग व नर्क,आणि तेथील इतर वास्तविकतेची माहिती अशा सत्य माणसाने दिली आहे,ज्याला त्याचे कट्टर शत्रूने देखील अमान्य केलेले नाही.तसेच कुरआन सारख्या पवित्र ईशग्रंथात देखील त्याबद्दल सर्वकाही लिहलेले आहे.ज्याची सत्यता,आपले व परक्यांनीदेखील मान्य केली आहे.

## प्रश्न दुसरा

दुसरी गोष्ट अशी जी तुमच्या मनांत संशय निर्माण करीत आहे ती अशी की जर सारे प्रेषित किंवा पैगंबर आणि त्यांचा धर्म आणि धर्मग्रंथ खरे आहेत तर मग इस्लाम धर्मच का स्विकारावा?

आजच्या वर्तमान जगांत ह्याचे उत्तर फार सोपे आहे.आपल्या देशाची एक संसद (पार्लिमेंट) आहे.येथे एक संविधान आहे.येथे जितके प्रधानमंत्री होवून गेलेत,ते सर्व भारताचे खरे पंतप्रधान होते.पंडित जवाहरलाल नेहरू, शास्त्री जी,त्यानंतर इंदीरा गांधी, राजीव गांधी,आणि व्ही. पी.सिंह वगैरे यांनी देशाच्या उन्नतीसाठी आणि गरजेसाठी,जे कायदे बनविले ते सर्व भारताचे कायदे हो. परंतु आता जे प्रधानमंत्री आहे, त्यांची संसद आणि सरकार जर कायद्यांत संशोधन करून,काही दुरूस्ती केली तर,त्यापुर्वी चा कायदा (जुना) रद्द होईल आणि भारताच्या प्रत्येक नागरिकाला त्याचे पालन अनिवार्य होईल.जर कोणी भारतीय नागरिक असे म्हणेल की,जेंव्हा इंदिरागांधी पंतप्रधान होत्या,त्याच खऱ्या होत्या.मी त्यांच्याच कायद्याचे पालन करीन.मला या नवीन पंतप्रधानाचा कायदा मान्य नाही.त्यांनी लागू केलेले कर मी देणार नाही;तर अशा माणसाला सर्वजण भारत विरोधी म्हणतील आणि तो शिक्षेस पात्र ठरेल. याचप्रमाणे सर्व धर्म

व धर्मग्रंथ आपआपल्या युगांत येऊन गेलेले सत्य होते आणि त्यांची शिकवण पण खरी होती.म्हणून त्या सगळ्या संदेष्टा (पैगंबर)व धर्माला सत्य जाणून घेतल्यानंतर ही अंतिम संदेष्टा किंवा पैगंबर हजरत मुहम्मद (स्व.)ह्यांच्यावर ईमान आणून,त्यांच्या धर्माचे व पद्धतीचे अनुकरण करणे हे प्रत्येक आद्य मानवाचे कर्तव्य ठरते.

## सत्यधर्म केवळ एकच

सर्व धर्म ईश्वराचेच आहेत.परंतु त्यांचे मार्ग वेगवेगळे आहेत पण त्यांचे ठिकाण एकच आहे,हे बरोबरन नाही.कारण सत्य केवळ एकच असते.परंतु असत्य अनेक असु शकतात.प्रकाश एकच असतो परंतु अंधकार बरेच असू शकतात.सत्य धर्म केवळ एकच आहे आणि तो सुरूवातीपासून एकच आहे.म्हणून त्या एकट्यालाच ईश्वर मानावे आणि फक्त त्याचेच ऐकावे.ह्यालाच इस्लाम म्हणतात.धर्म कधीच बदलत नाही केवळ त्याच्या प्रथा किंवा पद्धती (शरियत)काळानुसार बदलत राहतात.आणि ते सुद्धा त्याच परमेश्वरांनी दाखविलेल्या मार्गानुसार,जर मानव जात एक आहे आणि त्याचा ईश्वर एक आहे तर त्यांनी दाखविलेला मार्ग पण एकच.म्हणून कुरआनांत असे म्हटले आहे की,ईश्वराचा धर्म केवळ इस्लामच आहे.

## हा ही प्रश्न आहे

मनांत असा देखील एक प्रश्न येऊ शकतो की,हजरत मुहम्मद (स्व.)हे ईश्वराचे खरे नबी,ईशदुत किंवा संदेष्टा आहेत आणि तेच अंतिम दूत आहेत,हे कशावरून?

ह्याचे उत्तर अगदी स्पष्ट आहे की,सर्वप्रथम कुरआन हे ईशग्रंथ आहे.त्यात जगाला उद्देशून सत्यतेची जी उदाहरणे प्रस्तुत केली आहेत,तिचा सर्वजण स्विकार करतात.आणि आजपावे तो त्यांचा कोणीही विरोध केलेला नाही. त्यात हजरत मुहम्मद (स्व.)हे ईश्वराचे अंतिम संदेष्टा व सत्यवान असल्याची घोषणा करण्यांत आलेली आहे.दुसरी अशी गोष्ट अशी की,त्यांच्या जीवनाच्या क्षणा क्षणाच्या कार्याचे चित्रण जगासमोर आहे,त्यांच्या आयुष्याच्या प्रत्येक गोष्टीचे,इतिहासाचे पुस्तक सगळया समोर



उघडे आहे.

जगातील कोणत्याही माणसाचे जीवन,त्यांच्या जीवना इतके सुरक्षित व उघड नाही.त्यांचे विरोधी कट्टर शत्रू व इस्लामी इतिहासाचे द्वेष्टे,यांनी देखील त्यांना आपल्या उभ्या आयुष्यात आणि व्यक्तिगत जीवनात कधी खोट ठरविले नाही.त्यांचे नगरवासी त्यांच्या खरेपणाबद्दल शपथ घेत.ज्या व्यक्तिंनी आपल्या निजी जीवनांत कधीच खोटे बोलले नाही तर ते धर्माच्या किंवा ईश्वराच्या नावांवर कसे खोटे बोलतील?त्यांनी स्वतःअसे सांगितले आहे की,मी अंतिम नबी(संदेष्टा)आहे,माझ्या नंतर आता दुसरा कोणीही संदेष्टा किंवा पैगंबर येणार नाही आणि धर्म येणार नाही.आणि माझ्या विषयी सगळ्या संदेष्टांनी (पैगंबरांनी)भविष्यवाणी केलेली आहे.सर्व धर्म ग्रंथात अंतिम ऋषी,कल्कि अवतार,नराशंस वगैरेची जी भविष्यवाणी दिली गेली आहे आणि त्यांची ओळख आणि खूणा दिलेल्या आहेत,त्या सर्व फक्त हजरत मुहम्मद (स्व.)यांच्यातच आढळतात.

## डॉ.वेदप्रकाश उपाध्याय

डॉ.वेदप्रकाश उपाध्याय, जे वेदांत प्रकाश संघ, भारताचे संचालक आणि वेददर्शन धर्मशास्त्र आणि डिपइन जर्मनचे ज्यांना स्वर्ण पदक मिळाले आहे ते लिहतात की,ज्यांनी इस्लाम धर्माचा अभ्यास केलेला नाही आणि हजरत मुहम्मद (स्व.)च्या इस्लाम धर्माचा स्विकार केला नाही,तर तो हिंदु देखील नाही. कारण हिंदुधर्म ग्रंथात कल्कि अवतार,नराशंस हे जेंव्हा जन्माला येतील व तुम्हांला त्यांची ओळख पटेल,त्यावेळेस त्यांच्या धर्माचा स्विकार करावा असे लिहलेले आहे. तर, जर कोणी हिंदू आपल्या धर्मग्रंथावर आस्था बाळगतो.त्याने जर असे केले नाही तर मृत्यूनंतर परलोकांत त्याला ईश्वराचे दर्शन होणार नाही.तो ईश्वराच्या क्रोधाचा भागीदार ठरेल.आणि त्याला नर्काच्या अग्नींत कायमचे जळत रहावे लागेल(अधिक माहितीसाठी वाचा,पंडित वेद प्रकाश उपाध्याय यांची लिहलेली पुस्तके,१.कल्कि अवतार व मुहम्मद साहेब आणि २.नराशंस अंतिम ऋषी)

## श्रद्धा किंवा ईमानची आवश्यकता

मृत्यूनंतर च्या परलोकाच्या जीवनाव्यतिरिक्त,या इहलोकाच्या आपल्या व्यक्तिगत जीवनांत देखील आपल्याला ईमान,(श्रद्धा)आणि इस्लाम धर्माची आवश्यकता आहे.आणि हे प्रत्येक माणसाचे कर्तव्य आहे की,त्याने आपल्या एका पालनकर्त्या ईश्वराची भक्ती करावी. जो त्याला सोडून इतरांच्या घराच्या दारावर जाऊन हात पसरून डोके टेकतो, त्याचे जीवन कुत्र्यांपेक्षा जास्त लाजिरवाणे आहे.कारण कुत्रा देखील आपल्या मालकाच्या दारावर जाऊन,त्याचीच प्रतिक्षा करून,आशा बाळगतो,पण हा माणूस,असा कसा आहे?जो आपल्या खऱ्या मालकाला (ईश्वराला)सोडून दुसऱ्याच्या दारी, झुकत फिरतो,जे कुचकामी आहेत.

ह्या श्रद्धेची (ईमानाची)आवश्यकता माणसाच्या मृत्यूनंतर त्याच्या उपयोगी पडेल,जेथून तो कधीच परतणार नाही.आणि तेथे तो मरण्याचा प्रयत्न करील पण त्याला मरण येणार नाही.त्यावेळेस त्याला त्याचे खुप दुःख व पश्चाताप होईल.पण ते त्याच्या काही उपयोग पडणार नाही.जर माणूस या जगातून श्रद्धा व ईमानशिवाय मेला,तर तो कायमचा नर्काच्या अग्नीत जळत राहील.या जगात जर आपल्या शरीराला,एक अग्नीची ठिणगी जरी लागली,तरी आपण असहाय्य वेदनेने तडफडतो,तर ती नर्काची अग्नी येथील अग्नीपेक्षा सत्तर पटीने जास्त तीव्र व उष्ण असते आणि त्यांत कायम जळत रहावे लागणार आहे.जर आपली एक कातडी जळाली तर तेथे लगेच दुसरी कातडी बदलण्यात येईल आणि सारखी हीच शिक्षा भोगावी लागणार आहे.

## प्रिय वाचक

माझ्या प्रिय वाचक हो,न जाणे मृत्यू आपल्याला केंव्हा येईल?जो श्वास आपण आंत घेतो,त्याची बाहेरं पडण्याची शास्वती नाही आणि जो श्वास बाहेर सोडता,त्याची आंत घेण्याची शास्वती नाही.म्हणून मृत्यूच्या आधीवेळ आहे की,आपण आपली सगळ्यांत मोठी जबाबदारी जी सर्व प्रथम केली पाहिजे.तिचा विचार केला जावा. श्रद्धा किंवा ईमान जो पर्यंत आपण प्राप्त करू शकत नाही.तो पर्यंत आपले हे जीवन सार्थक होणार नाही आणि



मरणानंतरचे जीवन सफल होणार नाही.

मृत्यूनंतर आपणां सर्वांना आपल्या पालनकर्त्याकडे , जन्मदात्याकडे ( ईश्वराकडे) जावयाचे आहे.तेथे सर्वात प्रथम श्रद्धा किंवा ईमानाची विचारणा होईल.मला पण ह्या गोष्टीची भिती आहे की,या न्याय निवड्याच्या दिवशी,कोणी असे म्हणू नये की, ह्या गोष्टी कोणीही आम्हांला सांगितल्या नाहीत.

माझा विश्वास आहे की,ह्या सत्य गोष्टी आपल्या मनात पटल्या असतील माझ्या प्रिय भाग्यवान वाचक हो,या आणि आपल्या पवित्र मनाने व पुण्य आत्म्याला ईश्वराला साक्षी ठेवून आणि आत्मशुद्धी करून ईश्वराला आपल्या अंतरात्म्याच्या गुपिताचे ज्ञान ठेवणारा जाणून,हा प्रण,अशी प्रतिज्ञा करू या....

**अशहदु अल्ला इलाहा इल्लल्लाहु व अशहदु अन्ना मुहम्मदन अब्दुहू व रसूलुहू सल्लल्लाहू अलैहि वसल्लम**

अर्थः-मी साक्षी देतो की,अल्लाह (ईश्वर)च्या शिवाय कोणीच पूज्य नाही,तो एकटा आहे .त्याचा कोणी साथीदार अथवा भागीदार नाही आणि हजरत मुहम्मद सल्लल्लाहु अलैहि वसल्लम अल्लाह (ईश्वर)चे खरे भक्त आणि रसूल (पैगंबर)आहेत.

मी क्षमा मागतो आणि तौबा करतो,नास्तिकतेच्या (शिर्क) विचाराची व कृतीची आणि बहुदेववादी नितीची आणि समस्त पापांची आणि ह्या गोष्टीची शपथ घेतो की,आपल्या पालनकर्त्या, जन्मदाता अल्लाह (ईश्वर)च्या सर्व आदेशाचे पालन करीत आणि त्याचे खरे व सत्य पैगंबर (संदेष्टा) हजरत मुहम्मद (स्व.) यांच्या आदेशाचे पालन करीन व त्यांनी दाखविलेल्या मार्गाने मी माझे सर्व जीवन व्यतित करीन.

करूणामय आणि दयावान मालिक (अल्लाह)मला आणि तुम्हां सर्वांना मृत्यूच्या शेवटच्या क्षणापर्यंत या मार्गाचे अनुकरण करण्याचे सामर्थ्य द्यावे.

माझे प्रिय वाचक हो,आपण जर आपल्या मृत्यूच्या शेवटच्या क्षणापर्यंत ह्या आत्मविश्वासाने आणि पूर्ण निष्ठेने (ईमान)आपले संपूर्ण

जीवन व्यतित केले तर आपणांस समजेल की आपल्या या बंधुने हा अनमोल ठेवा कशात-हे ने प्रेमाने आपल्या स्वाधीन केला आहे.

## सत्वाची (ईमानाची परिक्षा)

ईमान राखून इस्लाम धर्म स्विकारल्यावर अल्लाह (ईश्वर) आपली परिक्षा घेऊ शकतो. परंतु नेहमी सत्याचाच विजय होतो. येथे पण सत्याचाच विजय होईल. म्हणून जर या आयुष्यात आपल्याला या सत्व परिक्षेतून जावे लागले तर येणाऱ्या संकटाला व होणाऱ्या यातनांना असे समजून सहन करावे की या इहलोकातील हे जीवन क्षणभंगुर आहे. मृत्यूनंतरचे जीवन अमर व अमर्याद आहे . तेथील स्वर्ग सुख प्राप्त करण्यासाठी आणि अल्लाहला (ईश्वर)ला प्रसन्न करण्यासाठी आणि त्याचे साक्षात दर्शन प्राप्त करण्यासाठी, ही परिक्षा म्हणजे काहीच नाही. यापेक्षा ही कठीण परिक्षा देण्यास मी तयार आहे.

## आपले कर्तव्य

दुसरी गोष्ट अशी की, ईमान आणि इस्लाम धर्माची सत्यता जाणून घेण्याचे कर्तव्य हा एक असा ठेवा आहे की, ज्यांनी तो मिळाला नाही, त्यांच्या स्वाधीन केला जावा.. म्हणून आपले पण हे कर्तव्य आहे आपण सुद्धा निस्वार्थ बुद्धीने आपल्या बंधुंच्या सहानुभूतीत आणि त्यांना अल्लाहच्या क्रोधा पासून , नर्काच्या अग्नींच्या असहाय्य यातनेच्या शिक्षेपासून वाचविण्यासाठी , दुःखाने व्याकुळ होऊन, ज्याप्रमाणे आपले अंतिम प्रेषित हजरत मोहम्मद पैगंबर (स्व.) यांनी लोकांना प्रेमाने प्रेरित केले, त्याचप्रमाणे, आपणासुद्धा प्रयत्न करावा. त्यांना सत्य मार्गाचे अवलोकन होण्यासाठी अल्लाह पाशी (ईश्वराजवळ) प्रार्थना करावी. असा माणुस काय माणुस म्हणण्याच्या लायक आहे, ज्याच्यासमोर एक आंधळा , दिसत नसल्यामुळे आगीच्या खाईत पडतो तेंव्हा तो एकदांही असे त्या आंधळ्याला म्हणत नाही की, तुम्हीं तिकडे जाऊ नका, पुढे आगीचा खड्डा आहे. माणुसकी तर ही आहे की, त्याला धरून उभे करावे आणि त्याला आगीत पडण्यापुर्वी



वाचावे आणि अशी प्रतिज्ञा करावी की, मी येथे असेपर्यंत तुला मुळीच आगीत पडू देणार नाही. ईमान आणल्या नंतर, ज्यांना इस्लाम धर्माची, प्रेषित मुहम्मद पैगंबराची आणि कुरआनची दिक्षा मिळाली आहे, त्या प्रत्येक मुसलमानाचे हे कर्तव्य आहे की, त्यांनी बहुदेववाद (शिर्क)आणि नास्तिकतेच्या (कुफ्र) विचाराने प्रेरित झालेल्या लोकांना, नर्काच्या अग्नींपासून वाचविण्यासाठी प्रयत्नशील रहावे .त्यांचे हाथ धरून, पाय पकडून त्यांना चुकीच्या मार्गावर जाण्यास मनाई करावी. त्यांना सत्याची जाणीव करून द्यावी. निःस्वार्थपणे व कळकळीने, सांगितलेली सत्य गोष्ट, माणसाच्या मनाला पटते. जर एका माणसाने देखील, आपली गोष्ट ऐकून समजवून घेतली आणि त्याने ईमान आणून, सत्कर्माला लागला, तर नक्कीच तुम्हांला तुमच्या कर्माचे, शुभ फळ मिळेल. कारण अल्लाह त्या माणसावर सर्वाअधिक प्रेम करतो व त्यावर प्रसन्न होतो, ज्यांनी बहुदेववाद (शिर्क)आणि नास्तिकता (कुफ्र)करणाऱ्यांना सत्य मार्ग दाखवून त्यांना इस्लाम धर्माची दिक्षा दिली. जसे आपला मुलगा आपल्याशी भांडण करून शत्रुच्या मदतीला गेला आणि त्याचीच गोष्ट ऐकू लागला. अशावेळी एका सज्जन माणसाने त्याची समजूत काढून त्याला तुमचा अज्ञाधारी बनविला तर, आपण त्या सज्जन माणसावर किती प्रसन्न व्हाल.

तसेच अल्लाह त्या भक्तावर अधिक प्रसन्न होतो, जो पदभ्रष्टांना सरळ मार्ग दाखवून त्यांना ईमान आणण्यास व इस्लाम धर्माची दिक्षा देण्याचा प्रयत्न करतो.

## ईमान आणून इस्लाम धर्म स्विकारल्यावर

इस्लाम धर्म स्विकारून, जेंव्हा त्या अल्लाहचे (ईश्वराचे)आपण खरेभक्त बनल्यावर आता आपणांस दररोज पाच वेळची नमाज (प्रार्थना) केलीच पाहिजे. त्यासाठी आपण ती प्रथम शिका आणि नंतर तशीच प्रार्थना (नमाज)करीत रहा. हीच अल्लाहची (ईश्वराची)पूजा होय .असे केल्याने तुमच्या आत्म्यास शांती मिळेल. अल्लाह तुमच्यावर प्रसन्न होईल. रमजानच्या महिन्यात तुम्हांला एका महिन्याचे रोजे (उपवास)ठेवावे लागतील. जर आपण

श्रीमंत असाल किंवा हज यात्रेस जाण्यासाठी जेवढा पैसा लागतो,तेवढा पैसा शिल्लक असेल आणि तुम्हांला कोणाचेही कर्ज द्यावयाचे नसेल तर आयुष्यात एकदा तरी हज करावेच लागेल.

खबरदार तुम्हीं आपले डोके, अल्लाहच्या (ईश्वराच्या) व्यतिरिक्त इतर कोणापुढें ही, झुकवता कामा नये.आपणांवर आता दारू,जुगार,व्याज लाच लुचपत, डूकराचे मांस आणि अशा सर्व प्रकारच्या वाईट सवई हराम व अवैध्य आहेत.त्या सर्व तुम्हांला सोडून द्याव्या लागतील आणि अल्लाहच्या मर्जीनुसार सगळे पवित्र अन्न,तुम्ही मोठ्या चवीने खाऊ शकता.

अल्लाहचे (ईश्वराचे) पवित्र ग्रंथ कुरआन,तुम्हंला नियमित वाचन करावे लागेल. आणि इतर स्वच्छतेचे आणि सफाईचे नियम तुम्हांला शिकावे लागतील.आणि अल्लाहचे प्रसन्नतेने,एकाग्रचित्ताने स्मरण करून तो तुमच्या समोर आहे, सर्वकाही पहात आणि ऐकत आहे पण तुम्ही त्याला पाहू शकत नाही हे लक्षात ठेवून त्यांची प्रार्थना (नमाज)केली पाहिजे.त्याला (ईश्वराला)अशी विनवणी केली पाहिजे की,हे माझ्या अल्लाह आमच्या मित्रांना,आमच्या कुटूंबांच्या सदस्यांना आणि नातेवाईकांना तसेच ह्या जगातील सगळ्या मानवाला बुद्धी दे,त्यांना ईमानी बनव आणि ईमानानेच त्यांना मृत्यू दे कारण ईमान हेच मानवाचे प्रथम व अंतिम आश्रय आहे.ज्याप्रमाणे ईब्राहिम अलै.या पैगंबरांना त्यांच्या ईमानाच्या कसोटीवर आगीत फेकण्यात आले पण त्या आगीचा त्यांच्यावर काहीच परिणाम झाला नाही तर ईश्वराच्या (अल्लाहच्या)इच्छेने त्या अग्नींकुडांचे नंदनवनांत रूपांतर झाले.त्याप्रमाणे आज सुद्धा ही ईमानाची शक्ति,आगीला पुष्प बनवू शकते आणि सत्य मार्गात येणारे सर्व अडथले दूर करू शकते.

तर हा आपला अमुल्य ठेवा मौलाना मुहम्मद कलीम सिद्दीकी साहेब,मोठ्या प्रेमाने व आपुलकीने,आपल्या स्वाधीन करीत आहेत.तो आपण स्विकारावा आणि त्याच्या प्रात्यक्षिकाने आपले जिवन सफल करावे.आणि इतरांना ही प्रोत्साहित करून,त्यांचे जीवन ही स्वर्गदायी बनवावे ही विनंती.धन्यवाद.



ज्ञान बोध आणि आचरण

# “जीवन गाथा”

*हे प्रत्येक मानवाच्या जीवनाचे पुस्तक आहे.

*ह्यांत तुमच्या जीवनांतील, प्रत्येक दिवसाच्या कर्माची नोंद आहे.

*ह्या पुस्तकाचे एक-एक पान, दररोज उलटून वाढत आहे.

*तर ह्या पुस्तकातील,मागील पाने,कमी-कमी होत चालली आहेत.

*एखाद्या दिवशी,हे त्या पुस्तकाचे शेवटचे पान असेल.

*त्यानंतर तुमचे डोळे मिटले जातील.

*तुमच्या दैनंदिन जीवनाच्या,प्रत्येक कर्माची नोंद.

*त्यांत झालेली असेल.

*तेच पुस्तक,जगधीश ईश्वर.

*परलोकांमध्ये तुमच्या हातात देईल व म्हणेल.....

*''वाच तुच वाच.तुझ्या आयुष्यातील प्रत्येक कर्माची ही 'जीवनगाथा' आहे''.

*त्यावेळेस,ते आपणांस नाकारता येणार नाही व ते खोटे आहे,असे म्हणता येणार नाही.

*तेंव्हा याबद्दल,

*आपण कधी विचार केला आहांत काय?

*की,आपण दररोज.

*यांत आपल्या कर्मांची,काय नोंद करीत आहोत?

*याबद्दल,आपण एवढे निष्काळजी कां?

*पण लक्षात ठेवा.

✲तो दिवस लवकरच आल्या शिवाय राहणार नाही.

✲अजून, ही वेळ गेलेली नाही.

✲सावध व्हा.

✲परमेश्वराशी क्षमा-याचना करा.

✲पश्चाताप करा.

✲परमेश्वराच्या आदेशाचे पालन करा.

✲आणि पुण्यवान व ऋणी व्हा.

✲तरच तुमचे जीवन सफल होईल.

✲स्वर्गात प्रवेश मिळेल.

✲अन्यथा, नर्कात बुडाल.

✲की, जिथे फक्त पिडीत यातना आणि वेदनांच आहेत.

✲आणि मृत्यूला थारा नाही.

**अ.सलाम (सोलापूर)**